**कंत्राटदारांच्या नोंदणीचे सुधारित नियम दि.२०/४/१९९८ च्या शासन निर्णयामधील सुधारणा/बदलांबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक सीएटी १०९६/प्र.क्र.१७२/इमारती-२**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- २१ सप्टेंबर,२०००.**

शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्रमांक सीएटी १०९६/प्र.क्र.१७२/इमारती -२, दिनांक २०/४/१९९८ अन्वये कंत्राटदारांच्या नोंदणीचे सुधारित नियम निर्गमित करण्यात आलेले आहेत. सदरहू शासन निर्णयामधील काही तरतुदींमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा/बदल करण्यात येत आहेत.

१.० **कंत्राटदारांच्या नोंदणीचे वर्गीकरण** - अमर्यादित रकमेची कामे घेण्याची क्षमता असलेल्या कंत्राटदारांना सध्या वर्ग १ मध्ये नोंदणी देण्यात येते. कंत्राटदारांच्या क्षमतेनुसार वर्ग १ मधील नोंदणीसाठी खालीलप्रमाणे उपवर्गीकरण करण्यात यावे -

| उपवर्ग | कामाच्या रकमेची मर्यादा |
|---|---|
| वर्ग १ अ | रु. २५.०० कोटीपेक्षा अधिक (अमर्याद) |
| वर्ग १ ब | रु. १५.०० कोटीपेक्षा अधिक ते रु.२५ कोटी |
| वर्ग १ क | रु. ७.५० कोटीपेक्षा अधिक ते रु.१५ कोटी |

१.१ कंत्राटदारांनी सादर केलेल्या अद्ययावत आयकर निपटारा प्रमाणपत्रातील गेल्या तीन ते पाच वर्षातील किमान/लघुत्तम उलाढालीच्या ४.५ पट किंवा कमाल/महत्तम उलाढालीच्या ३ पट यापैकी जी अधिक असेल ती रक्कम वर्ग १मधील वर्गीकरणासाठी विचारात घेण्यात यावी.

१.२ आयकर निपटारा प्रमाणपत्राची खातरजमा आयकर विभागाच्या संबंधित अधिका-यांकडून स्वतंत्रपणे करण्यात यावी. अन्यथा असे प्रस्ताव नोंदणीसाठी विचारात घेण्यात येणार नाहीत.

२. **परिच्छेद क्र.२ (ब) (v)** - कंत्राटदाराने पार पाडलेल्या/हाती असलेल्या खाजगी कामांच्या बाबतीत अनुज्ञप्तीधारक वास्तुशास्त्रज्ञांनी/चार्टर्ड इंजिनियर ह्यांनी प्रमाणित केले असेल तरच या खाजगी कामांच्या अंदाजित खर्चाच्या ५० टक्के एवढी रक्कम उलाढालीसाठी तथा हाती असलेल्या कामांसाठी विचारात घेण्यात यावी.

३. **परिच्छेद क्र.३ (अ) (iii)** - वर्ग १ ते वर्ग ५ मधील नोंदणीसाठी संबंधित कंत्राटदारांकडे, सोबतच्या परिशिष्टामध्ये विहीत करण्यांत आलेल्या गटांपैकी कोणत्याही एका गटातील संपूर्ण यंत्रसामुग्री स्वतःच्या मालकीची असणे अनिवार्य आहे. त्याचप्रमाणे अशा यंत्रसामुग्रीच्या मालकीबाबत निर्विवाद व निःसंदिग्ध पुरावा प्रस्तावासोबत सादर करणेही आवश्यक आहे.

उपरोक्त बदल आणि सूचना तात्काळ अमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( शि. वि. तामखडे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

मा. मुख्यमंत्री ह्यांचे प्रधान सचिव,
मा.मंत्री (सा.बां.)/पाटबंधारे ह्यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (सा.बां.)/पाटबंधारे ह्यांचे खाजगी सचिव,
वित्त विभाग/सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
महालेखापाल-१, मुंबई/महालेखापाल-२, नागपूर,
सचिव (रस्ते)/सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, ह्यांचे स्वीय सहाय्यक,
पाटबंधारे विभाग, मंत्रालय,
सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय

प्रत माहितीसाठी व आवश्यक कार्यवाहीसाठी -

सर्व मुख्य अभियंते, सा.बां.विभाग/पाटबंधारे विभाग,
मुख्य अभियंता, बृहन्मुंबई क्षेत्र विकास प्राधिकरण, मुंबई, महाराष्ट्र
गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण (म्हाडा), मुंबई, महाराष्ट्र
औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, शहर व औद्योगिक विकास महामंडळ, (सिडको), निर्मल बिल्डींग, नरीमन पॉईंट, मुंबई/महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई, पाटबंधारे विकास महामंडळ, कृष्णा/तापी/गोदावरी/विदर्भ, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई,
आयुक्त, सर्व महानगरपालिका (२ प्रतींसह),
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
अधीक्षक अभियंता व प्रादेशिक अधिकारी, भूपृष्ठ वाहतूक मंत्रालय (MOST),चेंबूर,मुंबई,
सर्व अधीक्षक अभियंते, सा.बां.विभाग/पाटबंधारे विभाग,
अधीक्षक अभियंता, पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, वरळी,मुंबई/महानगर पालिका,ठाणे/पुणे/कल्याण
संचालक, उपवने आणि उद्याने, मुंबई,
प्रतिनियुक्तीवरील सर्व अधिकारी,
सर्व कार्यकारी अभियंते, सा.बां.विभाग/पाटबंधारे विभाग/जिल्हा परिषद,
सर्व अधिकारी/कार्यासन अधिकारी, सा.बां.विभाग/पाटबंधारे विभाग, मंत्रालय,
कार्यासन इमारती-२ (निवडनस्ती).

# परिशिष्ट

**कंत्राटदारांकडे खालीलपैकी कोणत्याही एका गटातील संपूर्ण यंत्रसामुग्री स्वतःच्या मालकीची असणे आवश्यक आहे.**

| यंत्रसामुग्रीचा तपशील | वर्ग-१/२/३ | वर्ग-४/४अ | वर्ग-५ |
|---|---|---|---|
| **गट-१** | | | |
| ट्रक्स/टिप्पर्स/ट्रॅक्टर-ट्रॉली | ४ | ३ | २ |
| काँक्रीट मिक्सर | ३ | २ | १ |
| व्हायब्रेटर | ३ | २ | १ |
| ५ हॉर्स पॉवरचे पंप | २ | १ | १ |
| सेंटरींगचे साहित्य | ५०० चौ.मि. | ३०० चौ.मि. | १०० चौ.मि. |
| मेकॅनिकल हॉइस्ट | १संच | - | - |
| **गट-२** | | | |
| ट्रक्स/टिप्पर्स/ट्रॅक्टर ट्रॉली | १० | ६ | २ |
| एक्सकॅवेटर | २ | १ | - |
| रोड रोलर (डीआरआर) | २ | १ | १ |
| व्हायब्रेटरी रोलर | १ | - | - |
| वॉटर टँकर | २ | १ | १ |
| एअर कॉम्प्रेसर | २ | १ | - |
| काँक्रीट मिक्सर | २ | १ | १ |
| व्हायब्रेटर | २ | १ | १ |
| **गट-३** | | | |
| ट्रक्स/टिप्पर्स/ट्रॅक्टर ट्रॉली | ६ | ३ | २ |
| रोड रोलर (डीआरआर) | २ | १ | १ |
| व्हायब्रेटरी रोलर | १ | - | - |
| आस्फाल्ट मिक्सर व बॉयलर | १ | १ | १ |
| ड्रम मिक्स प्लांट | १ | - | - |
| सेन्सॉर पेव्हर फिनिशर | १ | - | - |
| मेकॅनिकल आस्फाल्ट स्प्रेयर | १ | - | - |
| काँक्रीट मिक्सर | १ | १ | १ |
| व्हायब्रेटर | १ | १ | १ |

---

एच-901(2000-9-00)2.